प्रकाशन आणि वितरण

ई साहित्य प्रतिष्ठान

मो. : 9869674820

e-mail : esahity@gmail.com

डिझाईन कन्सेप्ट

आर्टवर्ल्ड
Art is our language
डिझाईनर्स

**ArtWORLD Designers**

**Aurangabad. (M.S.), India**

e-mail : artworlddesigners@rediffmail.com

©

रमेश ठोंबरे

औरंगाबाद, महाराष्ट्र

मो. 9823195889

e-mail : rlthombre@gmail.com

# प्रकाशनपूर्व अभिप्राय....

## अर्थात पाठराखण

रमेशच्या 'प्रियेचे अभंग' या अभंग मालेचे ई-पोथीत झालेले रुपांतर पाहून आज मला अतिशय आनंद होत आहे.

रमेश ने पहिला अभंग लिहिला तेव्हा 'काहीतरी वेगळं' म्हणून बरेच वाचक आकर्षित झाले होते. तेव्हा कुणालाही किंवा स्वतः रमेशला सुध्दा वाटले नसेल की ही साखळी इतकी मोठी होईल. त्यानंतरचे काही अभंग रमेशने पेश केल्यावर एक मोठा वाचक वर्ग, चाहता वर्ग तयार होत गेला. प्रत्येक अभंग लोकांनी अक्षरशः डोक्यावर घेतला आणि त्यातूनच ही पुस्तकाची कल्पना पुढे आली. मग रमेश प्रियेच्या भक्तीरसात असा काही रंगला, की त्याला तोड नाही.

ह्या काळात रमेशच्या इतर कविता अगदी थोड्या आल्या पण प्रियेचे अभंग नियमित येत गेले. अभंगांचा हार छान गुंफला जात होता. यात प्रियेची भक्ती होती, तिच्या विरहातले कारुण्य होते, तिच्या सोबतचा शृंगार होता आणि मधून मधून हास्याचे कारंजे होते. प्रियेच्या भक्तित रमेश ने चौफेर फटकेबाजी केली. प्रियेचा बाप, भाऊ, आई-कुणालाही सोडले नाही.

साधे सोपे शब्द असलेले, पण त्यात खोल, गहिरे अर्थ असलेले अभंग वाचकांच्या मनावर मोहिनी घालत गेले आणि माझ्या सारख्या प्रियेच्या अनेक भक्तांनी रमेश ला 'संत' पद बहाल करुन टाकले

आज रमेशने या अभंगांचे इतक्या आकर्षक आणि देखण्या पुस्तकात रुपांतर करुन प्रियेच्या भक्तांना पुन्हा एकदा थक्क केले आहे. ह्या पुस्ताकाद्वारे रमेश चे अभंग जास्तीत जास्त लोकांपर्यंत पोचावेत आणि त्यातून प्रियेचे अधिकाधिक भक्त तयार व्हावेत या शुभेच्छा !

**- आकाश बिरारी**

Leeds, United Kingdom

# चार शब्द ....

वाचक भक्तजन हो!

छोट्या अभंगांचा अभ्यास करत असतांना काही विठ्ठलाचे अभंग लिहिले आणि ... त्याच विठ्ठलाने ‘प्रियेचे अभंग’ लिहिण्यास प्रवृत्त केले असे म्हटल्यास गैर ठरणार नाही. विठ्ठलाची ही कल्पना मलाही नविन आणि प्रेरणादायी वाटली आणि लिहित सुटलो...! काही काल्पनीक काही प्रासंगीक तर काही लिहिता लिहिता सुचलेल्या सर्वच विषयांना घेऊन प्रियेभोवती ‘फिरवत’ गेलो आणि बघता बघता त्याचं हे इ-काव्य झालं.

पहिले काही अभंग लिहिले आणि वाचकांचा भरभरुन प्रतिसाद आला... पुढे काय ...? योजलेल्या अभंगांची संख्या ३० - ४० नक्कीच होती पण प्रेयसी या एका विषयावर इतके अभंग लिहायचे हे काम सुरुवातीला मला जरा न पेलवणारं वाटलं पण ... पुढे पुढे विषय मिळत गेले आणि सारं काही सोप झालं ...!

‘प्रियेचे अभंग’ हे खरचं अभंगच असावेत त्यात भक्ती रस असावा, करुण रस असावा... आणि प्रियेच्या जागी देवाला उभे केले की ते त्या विठ्ठलाचे अभंग व्हावेत ... ती विठ्ठल भक्ती व्हावी ... असाच काहीतरी विचार हे अभंग लिहितांना मनात होता. तोच भाव बऱ्याच अभंगामध्ये ठेवण्याचा मी प्रयत्न केला आहे ...

पुढे वेगवेगळे विषय हाताळताना वेगवेगळे रस.. हास्य रस, श्रृंगार रस यात आले तेंव्हा तो आग्रही विचार मी बाजूला ठेवून काही अभंग लिहीले आणि पुन्हा शेवटी ‘प्रिया भक्ती सार’ या अंतर्गत ४ अभंग लिहून शेवट केला आहे.



## ।। प्रियेचे हे रुप ।।

प्रियेचे हे रुप
पाहिले म्या डोळा
भाव तो वेगळा
लोचनात ।।१।।

अधरी तियेच्या
विसावली धुंदी
होऊनिया बंदी
पडियलो ।।२।।

सुटेनात आता
मोहाचे ते पाश
लागलाची ध्यास
दर्शनाचा ।।३।।

रोज होते भेट
नित्य वाटे नवे
काय काय घ्यावे
साठवून ।।४।।

अडलो पुरता
प्रियेच्या रुपात
रात हि जपास
पुरी नसे ।।५।।

- रमेश ठोंबरे

## ।। प्रियेचे चरण ।।

प्रियेचे चरण
भाजले उन्हात
चटके मनात
बसलेले ।१।।

सोसवेना तिला
सकाळचे उन
शहारते मन
पाहुनिया ।।२।।

नाजूक ती काया
झाली लाले-लाल
डोळीयांचे हाल
माझ्याच का ? ।।३।।

वाटे उचलून
न्यावी एका हाती
आड येई मती
सज्जनाची ।।४।।

चरण भुवरी
पाहुनिया थेट ।
काळजाची वाट
रमेशाच्या ।।५।।

- रमेश ठोंबरे

## ।। प्रियेवरी चंद्र ।।

प्रियेवरी चंद्र
पुरताच फिदा
देखे सदा कदा
प्रियतमा ।१।।

मोकळाले केस
पांघरुनी शांत
अमावसी भ्रांत
दावितसे ।।२।।

पोर्णिमेचा चंद्र
तिलाची म्हणीतो
पुरता जाणितो
प्रिया रुप ।।३।।

आज हि करितो
वेगळाच लोच्या
छतावरी तिच्या
रेंगाळतो ।।४।।

परी तो खट्याळ
लोचटही फार
प्रियेचे उभार
न्ह्याळीतसे ।।५।।

- रमेश ठोंबरे



प्रियेचे अभंग

## ।। दर्पणात पाहे ।।

दर्पणात पाहे
प्रिया तिचे रुप
दर्पणही खूप
लाजतसे ।१।।

प्रियेचा रुपाचा
तो ही का दिवाणा
न जाने जमाना
मर्म याचे ।।२।।

दावितो प्रियेला
रोज नवी छबी
हीच त्याची खुबी
भुलविते ।।३।।

भाळली म्हणुनी
प्रिया दर्पणास
देई दर्शनास
वेळ त्याला ।।४।।

तो हि मग थोडा
फुगवी छातीस
दाखवी ख्यातीस
जमान्याला ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। कॉलेजात प्रिया ।।

कॉलेजात प्रिया
भेटलीच नाही
दिशा मग दाही
शोधियल्या ।।१।।

कॉलेजचा कट्टा
तो हि झाला सुना
तासही तो पुन्हा
भरलेला ।।२।।

फळयावर काळया
गणिताचा घोळ
लागे कसा मेळ
नजरेचा ।।३।।

भिंगातून पाहे
सर तो खडूस
फेके तो 'खडु' स
माझ्याकडे ।।४।।

भंगलेच पुन्हा
स्वप्न ते मनीचे
पाकीट 'मनी' चे
रिते-रिते ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। हातामध्ये विणा ।।

हातामध्ये विणा
भाव तो दिवाणा
भक्त तोची जाणा
प्रेयसीचा ।।१।।

भटकला जरी
देऊ नका दोष
मुखी मंत्र घोष
प्रेम प्रेम ।।२।।

चालतो वेगळा
मार्ग तो प्रेमाचा
करावा नेमाचा
गुरु तोच ।।३।।

शिष्यासही देतो
प्रेमाचा प्रसाद
प्रेयसीची साद
ऐकवितो ।।४।।

रमा म्हणे बघा
तोची एक नर
करील उद्धार
प्रेमाचा हो ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। प्रियेची ती भेट ।।

प्रियेची ती भेट
पहिलीच झाली
स्वप्नी मम आली
पहाटेच्या ।१।।

पहाटेचे स्वप्नं,
उलटे प्रहर ।
आता तो विरह
साहवेना ।।२।।

भेटेल ती कधी
लागलीच आस
घेतला मी ध्यास
पहाटेचा ।।३।।

पहाटेचं स्वप्नं
सत्यात ते आलं
दर्शन ते दिले
आज पुन्हा ।।४।।

संपणार कधी
स्वप्नांचा हा खेळ ।
काढ आता वेळ
सत्यातही ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। अवकाळीच तो ।।

अवकाळीच तो
प्रियेसाठी आला
छेडूनिया गेला
चिंब चिंब ।१।।

प्रियेच्या तनुचा
दिवाना दिवाना
घातला धिंगाणा
पुन्हा पुन्हा ।।२।।

झाला तो अधिर
मुक्त बरसला
ऋतु विसरला
ओला ओला ।।३।।

रस्त्यात प्रियेला
एकटी गाठतो
येऊनी भेटतो
सवे सवे ।।४।।

मला टाळण्याचा
शोधतो बहाणा
अवकाळी राणा
दूर दूर ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। प्रियेसाठी जीव ।।

प्रियेसाठी जीव,
टाकीला गहाण
प्रिया हिच जान
मज साठी ।।१।।

प्रियेचाच ध्यास
लागला जिवाला
पुन्हा-पुन्हा भास
नाविन्याचा ।।२।।

दर्शनच तुझे
सुखावेल नेत्र
डोयीचे हे छत्र
हाललेले ।।३।।

हरवली भूक
लागेना तहान
भक्त तुझा जाण
मीच एक ।।४।।

भेटीसाठी आता
आस्तिक मी झालो
पायरीशी आलो
दास तुझा ।।५।।

- रमेश ठोंबरे



प्रियेचे अभंग

## ।। कैवल्याची मुर्ती ।।

कैवल्याची मुर्ती
प्रियेस म्हणेल ।
मर्म हि जाणेल
कैवल्याचे ।।१।।

प्रियेच्या लोचनी
पाहिल ब्रम्हांड ।
विश्वाचे भ्रमण
नको मज ।।३।।

कर्म तेच सांगा
मज पामराला ।
पुजील प्रियेला
रात दिन ।।३।।

नित्य सदा गातो
गुण मी प्रियेचे
याहुन या 'वाचे'
काय श्रेष्ठ ? ।।४।।

रमा म्हणे मज
अवघ्याचा कंटाळा
एक प्रियतमा
आवडसी ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। लागता समाधी ।।

लागता समाधी
प्रियेच्या भक्तीची
परिक्षा शक्तीची
नको नको ।।१।।

मोडेल समाधी
कोणी एक नर
दुर्जन तो ठार
समजावा ।।२।।

हासण्यावरी का
नेता प्रिया संग
समाधीत भंग
आणू नये ।।३।।

प्रियेची महती
तुम्हास न ठाव
पुजताती देव
दगडाचे ।।४।।

रमा म्हणे मज
सर्वांचा कंटाळा
एक प्रियतमा
आवडसी ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। अभंगात माझ्या ।।

अभंगात माझ्या
प्रियेचीच भक्ती
प्रिया हिच शक्ती
मज साठी ।।१।।

प्रियेसाठी आता
सोडीला प्रपंच
नाडियले पंच
महा ज्ञानी ।।२।।

प्रियेविन मज
नाही आता कोणी
प्रियेसाठी वाणी
झिजविन ।।३।।

प्रिया प्रिया नाम
घेईन सर्वदा
माघार ती कदा
नाही नाही ।।४।।

सुटो आता जग
जावो आता प्राण
शोधील तो बाण
लोचनाचा ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। देवा तुझ्या साठी ।।

देवा तुझ्या साठी
नाही मज वेळ
घालू कसा मेळ
भक्तीचा रे ।।१।।

विसरलो मला
विसरलो तुला
प्राण एक झाला
तियेठाई ।।२।।

नको तो आठव
तव प्रतापांचा
झालो मी प्रियेचा
दास आता ।।३।।

नको मागे लागू
दर्शन हि देऊ
उगा 'वाट' लावू
साधनेची ।।४।।

होईल की भंग
प्रियेच्या संगाचा ।
आणि अभंगाचा
पेरलेल्या ।।५।।

- रमेश ठोंबरे



प्रेयसी अभंग

## ।। अडणार नाही ।।

अडणार नाही
आता किर्तनात
देश दर्शनात
दिसेचिना ।।१।।

नको मला पुन्हा
संताचे वचन
अपुरे हे ज्ञान
प्रेमा विन ।।२।।

नको धर्म ग्रंथ
नको ती पंढरी
प्रिया ज्ञानेश्वरी
मज साठी ।।३।।

कर्म धर्म सर्व
सोडिले मी आता
साक्षात्कार व्हावा
प्रेयसीचा ।।४।।

साधु संत भजे
देवाचीच भक्ती
प्रियेसाठी युक्ती
कोण सांगे ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। प्रिया प्राप्तीसाठी ।।

प्रिया प्राप्तीसाठी
सोडियले घर
मरियला ठार
'मी'च माझा ।।१।।

पाहुनिया वाट
शिणले हे डोळे
काळीजही जाळे
प्रियतमा ।।२।।

लागताही आस
प्रिया दर्शनाची
भेट त्या क्षणाची
व्हावी आता ।।३।।

प्राण हा व्याकुळ
मन हे अधिर
धरवेना धीर
भेटीलागी ।।४।।

'युगे अठ्ठाविस
तेही लक्ष माझे ।
दर्शन ते चोजे
घ्यावयाला ।।५।।

- रमेश ठोंबरे

## ।। प्रिये विन जग ।।

प्रिये विन जग
आहे निरंकार
वाळवंट ठार
भासतसे ।।१।।

एक नाम प्रिया
एक नाम भक्त
दोघे हि विरक्त
प्रेम भक्ती ।।२।।

प्रिया नाम घेता
हरावीच चिंता
मिळावी ती कांता
सत -जन्मी ।।३।।

प्रिया चरण रज
सांडियली जेथे
वसवावे तेथे
प्रेम तिर्थ ।।४।।

हेची दान देवा
मागतो तुम्हासी
प्रियाराधनेसी
एक व्हावे ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। नश्वर हा देह ।।

नश्वर हा देह
नश्वर हि काया
शाश्वत हो प्रिया
मजसाठी ।१।।

नको मज पैसा
नको मज धन
संतुष्ट हे मन
भक्तीतच ।।२।।

नको ती भूषणे
आणि आभुषणे
कशाला दुषणे
वैराग्याला ।।३।।

काय मज पाप
काय मज पुण्य
होईल मी धन्य
दर्शनाने ।।४।।

दुःखाचा आठव
विसरलो आता
मुखी नाम घेता
प्रिया प्रिया ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। भेटी लागी जिवा ।।

भेटी लागी जिवा
लागलीची आस
संपेना प्रवास
योजलेला ।१।।

शिणले हे नेत्र
व्याकुळले मन
एक एक क्षण
जड झाला ।।२।।

भेटीची मी आस
धरियली खास
अडखळे श्वास
दर्शनात ।।३।।

देवा माझे ध्येय
तुलाच रे ठावे
आता पूर्ण व्हावे
एकदाचे ।।४।।

त्याच साठी बघ
घेतली समाधी
भक्तीस या साधी
म्हणू नको ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। देवा तुझ्या दारी ।।

देवा तुझ्या दारी
प्रियेसाठी आलो
भक्त तुझा झालो
पाव आता ।१।।

प्रियेसाठी आज
भजतो मी तुला
सापडला मला
भाव आता ।।२।।

भोगिले रे तिने
माझ्यासाठी खूप
असे काय सुख
दाव आता ।।३।।

तिची वेदना रे
साहवेना खरी
लाव तू किनारी
नाव आता ।।४।।

झाले कष्ट मोठे
परिक्षा हि व्याली
वेळ फार झाली
धाव आता ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। सोन्याहून सोनसळी ।।

सोन्याहून सोनसळी
फुलाहून गोड कळी
कधी अफुचीच गोळी
प्रिया माझी ।।१।।

मन नाही थाऱ्यावर
कोकीळाच तारेवर
चांदनीच धरेवर
प्रिया माझी ।।२।।

नवतिचे रोप आहे
रोज नवे रुप दावी
रोज नवे वेड लावी
प्रिया माझी ।।३।।

सावलीच उन्हातली
परतली झाडाखाली
आणि पुन्हा वेडावली
प्रिया माझी ।।४।।

फैलावता हात दोन्ही
मिठीत न विसावली
का, न कधी लाडावली?
प्रिया माझी ।।५।।

- रमेश ठोंबरे

## ।। प्रियेचा तो बाप ।।



पाहिला मी आज
प्रियेचा तो बाप
सर्वांगाला काप
सुटला हो ।।१।।

अंगी तो धिप्पाड
झोकात चालतो
नाकात बोलतो
काही बाही ।।२।।

पिंजारुन आल्या
ओठावरी मिशा ।
दिसतील कशा ?
साळसूद ।।३।।

दुसऱ्याच क्षणी
माझ्यापुढे उभा
केला मग तोबा
ऐश्या नरा ।।४।।

कुठे मम प्रिया
कुठे तिची नाळ
पाहिल मी कुळ
मातेचेही ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। प्रियेची ती माता ।।

प्रियेची ती माता
शोधीत निघालो
शंकासुरा भ्यालो
मनातल्या ।१।।

सुंदर वदन
गहीराले डोळे
केस लांब काळे
पाठीवरी ।।२।।

चाल हि साजस
चंद्र कोर भाळी
सांगे थोर कुळी
लावण्याची ।।३।।

दृष्टा दृष्ट होता
झाली पाठमोरी
घरंदाज खरी
नारी असे ।।४।।

प्रियेच्या मातेची
झाली मग जाण
सापडली खाण
सौंदर्याची ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। गाठण्यास साली ।।

गाठण्यास साली
झालो मी अतुर
लागे हुर हुर
मनी माझ्या ।१।।

दिसेल सावली
लावण्यखणीची
मनात हि इच्छा
चाळवली ।।२।।

चाल हि वाकडी
नजर तिरकी
डोळयात फिरकी
पडलेली ।।३।।

वाढलेला घेर
कर्दमाचा गोळा
रुपावरी बोळा
फिरलेला ।।४।।

पटलीच खात्री
पुन्हा सौंदर्याची
प्रिया हिच साची
एकमेव ।।५।।

- रमेश ठोंबरे



विदेशी अभंग

## ।। प्रियेचा तो बंधू ।।

प्रियेचा तो बंधू
गुत्त्यावरी दिस्तो
झिंगलेला अस्तो
रात दिनी ।।१।।

बाप अडबंग
लेक खांब लांब
पिळलेला सुंभ
भासतसे ।।२।।

अडलेला शब्द
अडलेली वाचा
मदिराच त्याच्या
जळी तळी ।।३।।

बापास मी भ्यालो
लेका पुढे गेलो
अर्ध मेला झालो
दर्पानेच ।।४।।

एक-एक रत्न
अजब हे भारी
पुण्याईच खरी
घराण्याची ।।५।।

- रमेश ठोंबरे

## ।। भेदिले कुंपण ।।

भेदिले कुंपण
पोलादाचे दार
केला मग वार
नयनांचा ।।१।।

आळविला भाव
दवडिली भक्ती
लावलीच शक्ती
प्राणपणे ।।२।।

केली आराधना
केला फार दंगा
घातला मी पिंगा
प्रियेसाठी ।।३।।

होऊनी आसक्त
केला मग त्याग
आकर्षण योग
जपीयला ।।४।।

भेटणार प्रिया
आता रमेशाला
साक्षात्कार झाला
शेवटाला ।।५।।

\- रमेश ठोंबरे



प्रेमे अभंग

## ।। प्रियेच्या घराची ।।

प्रियेच्या घराची
वाट ती बिकट
गाव हि राकट
भासतसे ।१।।

गावामध्ये तिच्या
अवलिया भेटे
तो हि भक्त वाटे
प्रेयसीचा ।।२।।

म्हणे प्रेमी तिचा
मीच आहे खास
गत-जन्मी ध्यास
घेतला रे ।।३।।

काय तुझे कर्म
काय तुझी ख्याती
फुगलेली छाती
नको इथे ।।४।।

भेटणार कशी
तुला पामराला
जन्म माझा गेला
दर्शनात ।।५।।

- रमेश ठोंबरे

# भक्तजन हो !

नमस्कार ... !

पुन्हा एकदा स्वागत !

प्रिया प्राप्ती साठी चाललेली भक्ती (आपल्या मते - खटाटोप) आपण वाचलाच आहे (मी अनुभवला आहे एवढेच) तो आता सफल झाला (टाळया)

(किर्तनात मध्ये मध्ये टाळया आल्या की भक्तजन जागे होतात म्हणून .. तसे टाळया असो ! तर आता प्रिया मिळाली म्हणून मूड हा बदलणारच म्हणूनच हे बदललेल्या मुड सह - प्रिया प्राप्तीचे अभंग

प्रियेचे अभंगचा उत्तरार्ध ...

भक्ती करणे जसे कठिण तसेच भक्ती टिकवणे तितकेच कठीण ... म्हणून हा सुध्दा एक परिपाठच आहे .. (घरी करणार असाल तर गृहपाठ म्हणालात तरी चालेल...) जास्त ताण पडला तर आपआपल्या प्रियेची मदत घेऊ शकता... मुलींनी अर्थातच... सख्याची)

आता आपला जास्त अंत पाहणार नाही थोडक्यात अटोपणार आहे... बायकांना ... ची सवय आहे पण बाप्यांचे काय ?

- रमेश ठोंबरे
(प्रियामय)



प्रिया प्राप्तीचे अभंग

## ।। भेटली भेटली ।।

भेटली भेटली
प्रिया मज भेटली
स्वप्नच वाटली
पहाटेचे ।।१।।

प्रियेची चाहूल
लागली पहा रे
स्तब्ध झाले सारे
प्राणी पक्षी ।।२।।

मनी हुर हुर
ऐकीला मी दूर
नाद तो मधूर
पैंजनाचा ।।३।।

वात तो थांबला
मेघ बावरले
निर शांत झाले
जलाशयी ।।४।।

आजवर होती
भक्ती एक तर्फी
आता कुठे बर्फी
गोड झाली ।।५।।

- रमेश ठोंबरे



प्रिया प्रियेचे अभंग

## ।। पाहिला सिनेमा ।।

पाहिला सिनेमा
प्रिये सवे एक
तिथे मग मेख
समजली ।१।।

नसतोच कुणी
सिनेमा पाहत
ठेवतो चाहत
सखीवरी ।।२।।

थेटरात जेंव्हा
अंधार हा दाटे
प्रिया मग भेटे
बिलगुनी ।।३।।

हवा आहे कुणा
चालता सिनेमा
नायकाची तमा
कोण करी ? ।।४।।

संपला सिनेमा
झाला हो उजेड
लागलेची वेड
अंधाराचे ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। प्रियेचे पाहणे ।।

प्रियेचे पाहणे
आहे जीव घेणे
आता एक होणे
बाकी आहे ।१।।

बाहुपाशी तिज
घेण्यास अधीर
नको ना उशीर
प्रेमामध्ये ।।२।।

नाजूक ती काया
आसुसली फार
अंगी मग ज्वर
चढलेला ।।३।।

मोहवितो जेथे
सुगंधी गजरा
पदर लाजरा
आड येतो ।।४।।

छळतो हा वारा
आत येतो थेट
खिडकीचे पट
वाजवतो ।।५।।

- रमेश ठोंबरे



प्रिया प्रीतीचे अभंग

## ।। चढलेली धुंदी ।।

चढलेली धुंदी
गाठलेला ज्वर
वेडावलो पार
स्पर्शानेच ।१।।

वेगळीच नशा
प्रिया तुझी आहे
कोण मग पाहे
मदिरेला ।।२।।

अडखळे पाय
दूर तुझ्या जाता
सोडवेना आता
बाहुपाश ।।३।।

लागलेच आता
तुझे ते व्यसन
म्हणतील जन
वाया गेला ।।४।।

म्हणताती म्हणो
त्यांना काय ठावे
झिंगताती नवे
ब्रँण्ड रोज ।।५।।

- रमेश ठोंबरे



## || वेड लावी मला ||

वेड लावी मला
प्रिये तुझे अंग
कंचुकी ही तंग
त्यावरी ग |१||

उन्मादी तारुण्य
लावण्याचा घाट
उन्मादक थाट
शोभतो ग ||२||

नशिले नयन
सोडतात बाण
शोधतात प्राण
प्रेतात ग ||३||

आग आग होते
मग या जिवाची
तेंव्हा खरी गोची
भक्तीत ग ||४||

पाहताच तुला
जातो माझा तोल
दावे मग फोल
सज्जनाचे ||५||

- रमेश ठोंबरे



# ।। नको प्रिये राणी ।।

नको प्रिये राणी
अंत असा पाहू
वेळ हा सर्वथा
जाऊ पाहे ।१।।

आधीच आलीस
उशीरा तू फार
आणखी मी धीर
धरु कैसा ।।२।।

नको आता अशी
बोलतच राहू
संधी पुन्हा देऊ
काळोखाला ।।३।।

निघशील पुन्हा
उशीर म्हणोनी
साथीला न कोणी
तुज विन ।।४।।

होईल अंधार
जाशील निघुनी
पुन्हा तिच गाणी
विरहाची ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। धुंद होती रात्र ।।

धुंद होती रात्र
धुंद तुझी मिठी
गोष्ट तीच ओठी
आज आहे ।।१।।

प्रिये तुझ्या स्पर्शी
पाहिला मी स्वर्ग
आता तुझा वर्ग
नित्याचाच ।।२।।

प्रिये तुझे ओठ
थरारले फार
यौवनाचा भार
देखिला मी ।।३।।

मिठी मध्ये तुझ्या
आता चंद्र सुर्य
पुन्हा काय शौर्य
उरले ग ।।४।।

शरण मी तुला
आलो प्रिये देवी
सदा कृपा ठेवी
भक्ता वरी ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। प्रियेच्या मिठीत ।।

प्रियेच्या मिठीत
सामावले जग
विचारांचा वेग
मंदावला ।।१।।

शांत झाले मन
मिळताच साथ
आता कधी हात
सुटू नये ।।२।।

प्रिये माझी भक्ती
तुलाच गे ठाव
मनीचा तू भाव
ओळखीला ।।३।।

भेटलीस मला
धन्य आता झालो
सोम-रस प्यालो
तव ओठी ।।४।।

घोंगावता वात
शांत आता झाला
शरणही आला
तुज प्रती ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। लाजू नको प्रिये ।।

लाजू नको प्रिये
आजच्या या राती
खुलू दे ती प्रिती
योजलेली ।१।।

याज साठी केला
होता अट्टहास
गळयामध्ये फास
असू द्यावा ।।२।।

सौंदर्य पिठीका
प्रियेचा तो तीळ
पाहण्याचा काळ
आज आहे ।।३।।

तनुवरी तोच
शोभणार खास
वर्णिलेला भास
शोधतो मी ।।४।।

सापडेना तीळ
किती केला संग
उरले न अंग
शोधण्याचे ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। शेवटचा अभंग ।।

शेवटचा अभंग
प्रियेच्या चरणी
म्हणतील ज्ञानी
असे का हो ? ।१।।

जिच्या साठी केला
आहे हा प्रवास
तिचा तो अभ्यास
घेत आहे ।।२।।

शृंगाराच्या पुढे
असतो एक रस
परि तो हव्यास
इथे नाही ।।३।।

सुटतील बंध
जेंव्हा यौवनाचे
पडदे लाजेचे
पडलेले ।।४।।

समजून घ्यावी
भावना मतीची
घडी ती रतीची
आज आहे ।।५।।

- रमेश ठोंबरे

# भक्तजन हो !

नमस्कार ... !

आलात ... ? या .... घाबरु नका आता हा शेवट आहे ... सर्व दुःखांचा विविंचनांचा ... ! आपण आता भक्तीमय झाले आहात...

मग आता भिती कुणाची ... घाबरु नका 'ती' तुमच्या पाठीशी आहे ... तुमची भक्ती सफल होवो ...!

त्यासाठीच हे शेवटचे ४ अभंग ...

आत्तापर्यंतच्या सर्व अभंगांचे सार आपल्याला या अभंगांत मिळणार आहे... तेंव्हा अवधान असू ध्यावे ... !

हे चार अभंग ज्याच्या मुखी असतील तो ... सफल, जो हे चार अभंग जवळ बाळगेल त्याचे चंडा, मुंडा, रंडा, वितंडा यांच्या भूतबाधेपासून रक्षण करण्यास 'ती' सदैव पाठीशी राहिल.

तर भक्त हो हे अभंग म्हणजे ... तुमच्या भक्तीचे आणि प्रेमाचे रक्षण करण्यासाठीचे अभंग मंत्र आहेत... !

तेंव्हा वाचा आणि मुखोत्गत करा... काय सांगता केंव्हा गरज पडेल... तेंव्हा काय Orkut वर शोधणार ... ?

- रमेश ठोंबरे



# प्रिया भक्ती सार

## ।। १ ।।

प्रिया भक्ती सार
सांगतो तुम्हासी
अवधान थोडे
असु द्यावे ।।१।।

प्रिया मंत्र जपा
होवून निवांत
सुटेलकी भ्रांत
आयुष्याची ।।२।।

प्रिया भक्ती माना
जीवनाचे ध्येय
हवे कुणा श्रेय
भक्ती मध्ये ।।३।।

करा तिच्यासाठी
जे जे वांचे मन
मिळेल की धन
प्रिया रुपी ।।४।।

आणखी सांगतो
काय काय युक्ती
तुर्त एक भक्ती
असू द्यावी ।।५।।

- रमेश ठोंबरे



# प्रिया भक्ती सार

## ।। २ ।।

कॉलेजची वारी
नित्य असू द्यावी,
हातामध्ये चावी
बाईक ची ।१।।

प्रियेचा स्वभाव
तन आणि मन
घ्यावे निरखून
आपणची ।।२।।

पहा तपासून
तिची प्रेम खोली
आणि गोड बोली
नित्य नेमे ।।३।।

प्रिया नाम मुखी
असावे सर्वदा
आणि दिल फिदा
तिच्यावरी ।।४।।

करु नका लगट
प्रिये सवे कधी
काय कर्म आधी ?
पुढे ऐका ।।५।।

- रमेश ठोंबरे



## ।। ३ ।।

मागिले अभंगी
सांगितली भक्ती
आता थोडी युक्ती
सांगतो मी ।१।।

प्रियेशी दुरावा
सखीशी सलगी
करावी खाजगी
नकळत ।।२।।

पेटेल मत्सर
घुमेल पारवा
तेंव्हा हा दुरावा
मिटवावा ।।३।।

एक तर्फी आग
होईल वणवा
प्रेमाची वानवा
नाही मग ।।४।।

आता थोडे पहा
प्रियेचे ते कुळ
आणि कुठे मूळ
लावण्याचे ।।५।।

- रमेश ठोंबरे



# प्रिया भक्ती सार

## ।। ४ ।।

शेवटचे सार
पुन्हा अवधान
वेचलेत ज्ञान
कथिलेले ।।१।।

कर्म करा आता
ठेऊन ते ध्येय
मिळेल जे प्रिय
ज्याचे त्याला ।।२।।

ध्येया विना कर्म
मानिजे निष्कर्म
हेच आहे मर्म
अभंगाचे ।।३।।

पुन्हा पुन्हा पहा
स्वप्नी तिचे रुप
हुरुप तो खूप
जागू द्यावा ।।४।।

प्रिया भक्ती सार
शक्ती रस चूर्ण
सकळ संपन्न
झाले कि हो ।।५।।

- रमेश ठोंबरे

तुम्ही केलेलं
# प्रियेचं कौतुक

छा गये ..!!
तोडतोयस मित्रा !!
प्रेमात पडलेल्याला प्रिया आणि देव वेगळा थोडीच.. ?? त्यामुळे हे माध्यम अचूकच आहे !!
You are one of those few people who are blessed..
अफलातून ... अप्रतिम कल्पना आहे ... मला प्रचंड आवडल्या .. कल्पना, रचना आणि प्रियतमा .. तिनही !!

**- रणजीत पराडकर**
औरंगाबाद / ठाणे

मित्रा, खरच उत्कृष्ठ काव्यशैली आहे ... खूप सुंदर शब्दरचना .. सहसा प्रेमभंग वाचायला मिळतात पण प्रेम-अभंग पहिल्यांदाच वाचतोय तेही इतके अप्रतिम ... अशी रचना वाचावयास दिल्याबद्दल खूप खूप खूप खूप आभार

**- पंकज**, पुणे

संत रमेश ठोंबरे,
आपले सर्व अभंग वाचले. असेच लिहित राहिलात तर आमच्यासारखे वाचक, भक्त कधी होतील, त्यांचे त्यांनाच कळणार नाही.
आपल्या प्रतिभेविषयी कुणासही यत्किंचितही शंका नसावी. लख्ख चकाकणारं अस्सल सोनं आहे. (जे सध्या अतिशय महाग आहे.)

**- खरा वाचक (अनामिक)**
मुंबई

तुम्ही केलेलं
# प्रियेचं कौतुक

प्रिय रमेश
सलग सर्व अभंग आजच वाचले. मुळात कल्पना भन्नाट त्यात शब्दांची अचूक निवड. अभंग हा प्रकार या 'अश्या' विषयासाठी करुनच अर्धी बाजी तुम्ही मारलेली. बाकी अर्धे काम विषय विविधतेने केलेले ... मला सर्वात आवडलेली ...प्रियेविन जग ... अर्थात इतरांची आवड वेगळी असू शकते.

**- डॉ.अशोक**
औरंगाबाद / पुणे

पुढच्या इ-प्रकाशनासाठी हा धागा सुचवावा इतकं हे सगळं अप्रतिम आहे ...

**- कवि मित्र**

वा भाऊ ... जमलं का तुझ आणि तुझ्या प्रियेचं... झकास चला उडवुन टाकु बार !

**- अविनाश**

ठोकला आहेस मित्रा, जबरदस्त. काय काय म्हणून म्हणू तुला रे !
नाविन्य, शब्दांची चमत्कती, रचना लावण्य, विषय वैविध्य, शब्द सामर्थ्य आणि अजुनतरी पातळी खालावलेली नाही.
महान !

**- सारंग (काव्यसाधक)**
पुणे

तुम्ही केलेलं

# प्रियेचं कौतुक

लोकोत्तर स्त्री पुरुष केवळ 'व्यक्ती आणि वल्ली' पुरतेचे उरले आहेत असे जर कोणी म्हणाले तर त्यांना 'मराठी कविता' माहित नाही, हे मी ठामणे सांगु शकतो... येथे अनेक विभुती सुखाने अज्ञातवासात रममाण आहेत... रमेश .. त्या पैकीच एक !

गांधी हा शब्द ऐकल्यावर 'पंजा' किंवा शंभराची नोट किंवा इतिहासाच्या परिक्षेतील प्रश्न यापैकी काहीतरी एक आठवणारी आजची पिढी ! एवढी प्रचंड प्रेरणा घेऊन रमेशने गांधीजीवर पन्नासहून अधिक उत्तमोत्तम कविता लिहिल्या आहेत. मान-अपमान स्वीकारुन - सहन करुन त्यांनी त्यांचा तो उपक्रम एवढा शिस्तबध्द पध्दतीने राबवला की मला स्वतःला गांधी हा शब्द ऐकला की रमेशची आठवण होते.

धन्य ते गांधी आणि धन्य ते रमेश

(आजकाल गांधीजींची जागा कोणीतरी 'प्रिया'ने बळकावली आहे ! सत्याग्रहाची जागा आता प्रेमाग्रहाने घेतली आहे.

**- क्लोराफॉर्म (भुषण किणगांवकर)**
IT ची पंढरी, United States

aai shapath !! mala watlach hota bapacha vachlyanantar ki maatechi ashich kahitari hatake lihishil!!!
GR8 !! khup haslo!!

**- निरज आडे**
पुणे - नांदेड

तुम्ही केलेलं

# प्रियेचं कौतुक

सांगतो तुला मी । नको जाऊ वाटे
बोचतील काटे । वेदनांचे ।।१।।

तिचिया घरासी । कुंपण काटेरी ।
आणतील जेरी । माझ्यासम ।।२।।

कवाड घराचे । पोलादाचे आहे ।
तुझी वाट पाहे । खवीस तो ।।३।।

अंगणी विहीर । आहे फार खोल।
सावर रे तोल । स्वतःचाच।।४।।

- **उपेंद्र चिंचारे**
पुणे

सदा येथे यावे । प्रेमाचे उधान ।
प्रेमाचे निधान । रमेशजी ।।१।।

नित्यनेमे करी । प्रियेचीच पुजा ।
असा नाही दुजा । एक रमेश ।।२।।

प्रियेसाठी वाही । डोक्यावरी पाणी ।
चाले अनवाणी । प्रेमवेडा ।।३।।

रोज घेत असे । प्रेमाचा शोध ।
मग करी बोध । इतरांसी ।।४।।

- **हरिश दांगट**
Sunnyvale, United States

# तुम्ही केलेलं प्रियेचं कौतुक

**|| जय जय रमेशजी महाराज की जय ||**

लाभो ऐसा गुरु,
भक्तगण झालो
अभंगी दंगलो
रमेशाचे ||१||

नियमित वाचा
प्रियेचे अभंग
सारे त्यात रंग
प्रेयसीचे ||२||

प्रियेचे अभंग
धागा हा निराळा
आजच हो चाळा
संपूर्णच ||३||

मनाच्या सारखी
ज्याला हवी जैसी
लाभो त्याला तैसी
प्रेयसी हो ||४||

सदिच्छा अमुची
सदैव पाठीशी
स्वप्न साकारशी
प्रेयसीचे ||५||

**- कल्पी जोशी**
चंद्रपुर

**रमेश ठोंबरे यांची माफी मागून ... विडंबन ...**

जावई हा ठग
आहे लुच्चा फार
वेडा पिसा ठार
भासतसे ||१||

एक ह्याचे डोक
एक ह्याचा खिसा
दोन्हीही रिकामे
हाय देवा ||२||

ह्याचे नाम घेता
लागावीच चिंता
कामाचे वाटोळे
ठरलेले ||३||

ह्याची चरण रज
सांडियली जेथे
वादळ तेथे रे
हमखास ||४||

हेच दान देवा
मागते तुम्हासी
करा यास तुम्ही
हद्दपार ||५||

**- रेणूका खटावकर (रेपाळ)**
United States